विविध शासकीय रुग्णालयांकडून आकारल्या
जाणाऱ्या रुग्णालयीन शुल्काच्या स्वीय प्रपंची
खात्यातील जमा रकमेच्या विनियोगाबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
सार्वजनिक आरोग्य विभाग,
*शासन निर्णय क्र.जिरुफी १०००/प्र.क्र.९०/भाग २/आरोग्य ३*
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ७ मार्च, २००६.**

**वाचा :** (१) शासन सार्वजनिक आरोग्य विभाग निर्णय क्र.जाबॅप्र १०९९/प्र.क्र.७/९९/जाबॅक, दि.६.११.९९.
(२) शासन सार्वजनिक आरोग्य विभागनिर्णय क्र.जाबॅप्र १०९९/प्र.क्र.७/९९/जाबॅक दि.३१.७.२०००.
(३) शासन सार्वजनिक आरोग्य विभाग निर्णय क्र. जाबॅप्र १०९९/प्र.क्र.७/९९/जाबॅक दि.१०.७.०१
(४) शासन सार्वजनिक आरोग्य विभाग निर्णय क्र. .जाबॅप्र १०९९/प्र.क्र.७/९९/जाबॅक दि.१२.१२.०२.
(५) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई ह्यांचे पत्र क्र.संआसे/रुग्णालयीन शुल्क/स्वीय प्रपंची/ कक्ष ३, /०६, दि.१६.२.०६.

...

**प्रस्तावना** : उपरोक्त अनु.क्र.(१) येथील दि.६.११.१९९९ च्या शासन निर्णयान्वये रुग्णांकडून वसूल केलेल्या शुल्काच्या वापराबाबत प्रस्तुत शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" नुसार ज्या बाबींवर खर्च करण्याची अनुमती देण्यात आली आहे त्यांची सूची व कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. या शासन निर्णयानुसार कार्यवाहीबाबत काही अनियमितता घडल्यामुळे ह्यापैकी काही बाबींवरील खर्चावर उपरोक्त अ.क्र.(४) येथील दि.१२.१२.०२ च्याशासन निर्णयान्वये तात्पुरते निर्बंध ठेवण्यात आले आहेत. सद्यःस्थितीत असे आढळून आले आहे की, अनेक रुग्णालयांच्या स्वीय प्रपंची खात्यामध्ये मोठ्या प्रमाणात निधी शिल्लक पडून आहे व काही बाबींवरील निर्बंधामुळे तो निधी खर्च होऊ शकत नाही यामुळे अत्यावश्यक व किरकोळ बाबींसाठी देखील हा निधी उपलब्ध होत नाही व त्याचा परिणाम रुग्णालयांच्या दैनंदिन कामकाजावर होत आहे म्हणून मुळ शासन निर्णय पुनःस्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : शासन निर्णय क्र.जाबॅप्र १०९९/प्र.क्र.७/९९/जाबॅक, दि.६.११.१९९९ मध्ये नमूद खर्चाच्या विहित बाबी आणि त्याविषयीच्या अटी व शर्ती यांच्या अधीन राहून दि.१२.१२.०२ चा शासन निर्णय अधिक्रमीत करुन संदर्भित अनु.क्र.(१) हा मुळ शासन निर्णय पुनःस्थापित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर मुळ शासन निर्णयातील बाबी खालीलप्रमाणे आहेत :-

**अ)** रुग्णालयातील यंत्रसामुग्री, वाहने, उपकरणे, विद्युत प्रणाली, संगणक इत्यादींच्या दुरुस्ती व देखभालीसाठी, इंधन वंगणासाठी

**ब)** रुग्णालयाच्या इमारतींची किरकोळ दुरुस्ती व देखभाल यामध्ये काचेचे तावदान बदलणे यासारख्या छोट्या दुरुस्त्यांचा समावेश असावा.

**क)** रुग्णालय उपयोगी साहित्य खरेदी करणे - यामध्ये वॉटर कुलर, एअर कुलर, वॉटर फिल्टर, स्वयंपाकाची उपकरणे तसेच अत्यावश्यक व जीवन रक्षक औषधे यांचा समावेश असावा.

**ड)** गरीब रुग्णांना संदर्भित करण्यासाठी आवश्यक असलेल्या वाहतूकीसाठी.

**फ)** कार्यालयीन खर्चांतर्गत येणाऱ्या बाबी विशेषतः लेखनसामुग्री खरेदी, वीज, पाणी आणि दूरध्वनी देयके इत्यादी अदा करण्यासाठी.

**भ)** रुग्णालयात एखादी नाविन्यपूर्ण योजना राबविण्यासाठी.

(कृ.मा.प. -

२. वरील बाबींसंबंधात खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१ मुळ शासन निर्णयातील अ), ब), क), ड) व भ) येथील सर्व बाबी आणि फ) येथे नमूद बाबींपैकी वीज, पाणी, दूरध्वनी देयके वगळता इतर सर्व बाबींवरील खर्चाकरीता संचालकांची मान्यता घेण्यात यावी.

२ वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम दि.११.७.२००१ मधील विहित वित्तीय अधिकार तसेच तत्संबंधीत तरतूदींचे पालन होणे आणि अन्य मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन कार्यवाही होणे आवश्यक आहे.

३ जीवनावश्यक व अत्यावश्यक औषधांची सूची संचालकांनी तयार करावी व त्या मर्यादेतच संबंधितांनी खरेदी करावी व त्याबाहेरील औषधांची खरेदी होणार नाही याची दक्षता घ्यावी.

३. या आदेशांचे पालन यथायोग्य होण्याच्या दृष्टीने संपूर्ण नियंत्रण व जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा ह्यांची राहील. स्वीय प्रपंची निधीतून होणाऱ्या खर्चाबाबत सर्व आरोग्य मंडळांचा एकत्रित त्रैमासिक अहवाल शासनाकडे संचालकांनी सादर करावा.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र.मो.आडे )
कार्यासन अधिकारी.

प्रति,
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
सर्व सहसंचालक, आरोग्य सेवा.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
सर्व मंडळांचे उपसंचालक, आरोग्य सेवा.
सर्व महाविद्यालये व दंत महाविद्यालयांचे अधिष्ठाता.
सर्व मनोरुग्णालये व क्षय रुग्णालयाचे अधीक्षक.
बृहन्मुंबईतील सर्व शासकीय रुग्णालयांचे अधीक्षक.
सर्व स्त्री रुग्णालयांचे अधीक्षक.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
सर्व कुटीर रुग्णालयांचे अधीक्षक.
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ , मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखाधिकारी, मुंबई.
अतिरिक्त संचालक, महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्प, मुंबई.
वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्प, मुंबई.
उपसचिव, महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्प, मुंबई.
कक्ष अधिकारी (आ.४) सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (आ.३), सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.

------

## जाहीर निविदा सुचना

नाशिक येथील विभागीय संदर्भ सेवा रुग्णालयासाठी ***हृदयरोग, कर्करोग व मुत्रपिंड विकार शस्त्रक्रियासाठी लागणा-या छोटी हत्यारे व साहित्य*** पुरवठयासाठी स्पर्धात्मक दर निमंत्रित करण्यात येत आहेत. उत्पादन, विक्री, वितरण क्षेत्रातील ख्यातनाम उत्पादक / पुरवठादारांनी रुग्णालयासाठी आवश्यक विहीत मानके, परिमाण व दर्जानुसार रुग्णालयात पोहोच करण्यासाठी एकत्रित दर विहीत नमुन्यात सादर करणे आवश्यक आहे. (**वॅट व टॅक्स यासारखे कर स्वतंत्र दर्शविण्यात येऊ नये, अन्यथा अशा निविदा ग्राह्य धरण्यात येणार नाही**)

उपरोक्त बाबींसाठी मोहोरबंद निविदा **२ लिफाफा** पध्दतीने सादर करण्यात याव्यात.

प्रत्येक बाबीसाठी स्वतंत्र विहित निविदा नमुना, निविदेच्या अटी व शर्ती दिनांक २२.०१.२००९ ते दिनांक १२/०२/२००९ रोजी दुपारी ०१.०० वाजेपर्यंत या कालावधीत कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी आणि कार्यालयीन वेळेत दुपारी ०३.०० वाजेपर्यंत प्रत्येकी रुपये ३०००/- (नापरतावा) अदा करुन वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, स्व. इंदिरा गांधी चौक, शालीमार, नाशिक यांच्या कार्यालयातून प्राप्त करण्यात याव्यात. मोहोरबंद निविदा दिनांक १३/०२/२००७ रोजी दुपारी ०३.०० वाजेपर्यंत सादर करण्यात याव्यात. मोहोरबंद निविदा शक्यतो त्याच दिवशी वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, स्व. इंदिरा गांधी चौक, शालीमार, नाशिक यांच्या दालनात सायंकाळी ०५.०० वाजता उघडण्यात येतील. प्राप्त निविदांपैकी कोणतीही एक किंवा सर्व निविदा कोणतेही कारण न देता नाकारण्याचा अधिकार राखून ठेवण्यात येत आहे.

सदर निविदा सुचना वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, स्व. इंदिरा गांधी चौक, शालीमार, नाशिक कार्यालयाच्या सुचना फलकावर लावण्यात आली आहे.

सदर निविदा सुचना महाराष्ट्र शासनाच्या तसेच आरोग्य सेवा संचालनालयच्या वेबसाईटवर सुध्दा प्रसिध्द करण्यात आली आहे

वैद्यकीय अधीक्षक,
विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय,
नाशिक.

Tender Details

| Tender No. | Tender Year | Tender Inviting Authority | Tender Inviting Authority Address | Tender Description | Estimated Cost of Tender |
|---|---|---|---|---|---|
| No.RRHN/Tender No. 1/2009 | 2008-2009 | Medical Superintendent, Regional Referral Hospital, Nashik. | Indira Gandhi Chowk, Shalimar, Nashik. | Tender for purchase of Heart, Cancer, Urology Minor Instruments | 50 Lacs |

Tender Form Details

| Fee | Tender Accepting Authority | Issue Starting Date & Time | | Issue End Date & Time | | Issue Submission Date & Time | | Tender open Date & Time | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | (dd/mm/yyyy) | (hh:mm) | (dd/mm/yyyy) | (hh:mm) | (dd/mm/yyyy) | (hh:mm) | (dd/mm/yyyy) | (hh:mm) |
| 3000 | Medical Superintendent, Regional Referral Hospital, Nashik. | 22.01.2009 | 10:00 | 12.02.2009 | 15:00 | 13-02-2009 | 15:00 | 13.02.2009 | 17:00 |

| Pre Bid Details |
|---|
| -- |

| Goods Details | | |
|---|---|---|
| Tender No. | Goods Description | Goods Quantity |
| No.RRHN/Tender No. 1/2009 | Attached herewith to this file | As Per Mention In Tender |

Medical Superintendent
Regional Referral Hospital,
Nashik